**पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे अंतर्गतचा बांधकाम कार्यप्रकारातील १ विभाग व ५ उप विभागीय कार्यालये आणि पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे अंतर्गत १ उप विभागीय कार्यालय सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत करुन, अस्तित्वातील व नवीन सिंचन शाखा रुपांतरीत कार्यालयास जोडून कार्यालयाची फेररचना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आढावा २०१४/प्र. क्र.२१२/२०१४/आ.(प्रशि)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

**दिनांक -: ५ सप्टेंबर, २०१४.**

**वाचा:**

१) शासन निर्णय, वित्त विभाग,क्र: ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९,दि.८ मार्च, १९८४.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२.
३) शासन निर्णय, जलसंपदा विभाग,क्र.आढावा १००२/३३५/२००२/आ (प्रशि), दि.६/२/२००३.
४) शासन निर्णय,पाटबंधारे विभाग,क्र: एमआयएस-१०९०/६५/९०/आ.(क्षेप्र.), दिनांक १/७/१९९१.
५) शासन ज्ञापन,जलसंपदा विभाग, क्र: आस्था-२०१३/(२३/२०१४)/लपा-१, दि.२७/०१/२०१४.
६) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र:मुदतवाढ-०३१४/(११२/१४)/मोप्र-१, दि.१९/३/१४.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ अंतर्गत मुख्य अभियंता (जसं) जलसंपदा विभाग, पुणे अंतर्गत पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे या मंडळ कार्यालयाअंतर्गत लघु पाटबंधारे विभाग क्र.१, पुणे विभागाकडे माहे-फेब्रुवारी, २०१४ अखेर ७४,२७९ हेक्टर रब्बी समतुल्य सिंचन क्षमता निर्माण झाली आहे. यास्तव लघु पाटबंधारे विभाग क्र.१, पुणे हा बांधकाम कार्यप्रकारातील विभाग अंतर्गतच्या ६ पैकी ४ उप विभागीय कार्यालयांसह सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत करुन या रुपांतरीत विभागास पुणे पाटबंधारे विभागांतर्गतच्या अस्तित्वातील २ सिंचन शाखा व नवीन १४ सिंचन शाखा अशा एकूण १६ सिंचन शाखा कार्यालयांसह पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे अंतर्गत उपसा सिंचन व्यवस्थापन विभाग, पुणे या नावाने सिंचन व्यवस्थापनाच्या कामासाठी कार्यान्वित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

तसेच पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे अंतर्गतच्या खडकवासला पाटबंधारे विभाग, पुणे या विभागाकडील खडकवासला प्रकल्पाची एकूण ६२,१४६ हेक्टर निर्मित सिंचन क्षमता पूर्ण झाली आहे. यास्तव खडकवासला पाटबंधारे विभाग, पुणे अंतर्गतचा खडकवासला कालवा उप विभाग क्र.३, इंदापूर हा बांधकाम कार्यप्रकारातील उप विभाग सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत करुन, खडकवासला पाटबंधारे उप विभाग क्र.१, दौंड या उप विभागांतर्गतची अस्तित्वातील ४ सिंचन शाखा कार्यालये रुपांतरीत सिंचन व्यवस्थापन उप विभाग कार्यालयास जोडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे या बांधकाम मंडळ कार्यालयाकडील भामा आसखेड उप विभाग क्र.५, करंजविहिरे या उप विभागीय कार्यालयात भामा आसखेड व आंद्रा प्रकल्पाची कामे आहेत. या उप विभागात एकूण ३२,४४३ हेक्टर इतकी रब्बी समतुल्य सिंचन क्षमता निर्माण झाली आहे. हा उप विभाग सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत करुन, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे अंतर्गतची ३ अस्तित्वातील व नवीन २ सिंचन शाखा कार्यालये निर्माण करुन भामा आसखेड सिंचन व्यवस्थापन उप विभाग, करंजविहिरे या नावाने सिंचन व्यवस्थापनाच्या कामासाठी पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे अंतर्गत

कार्यान्वित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. उपरोक्त बाबींच्या अनुषंगाने, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे अंतर्गतच्या कार्यालयांची फेररचना करण्याकरीता शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

१) पाटबंधारे मंडळ, पुणे या मंडळ कार्यालयांतर्गतचा **लघु पाटबंधारे विभाग क्र.१, पुणे हा बांधकाम कार्यप्रकारातील विभाग अंतर्गतच्या ५ पैकी ४ उप विभागांसह सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत करण्यात येत आहे.** या रुपांतरीत विभागास याच मंडळ कार्यालयांतर्गतची अस्तित्वातील २ शाखा व नवीन निर्माण होणारी १४ शाखा कार्यालये अशी एकूण १६ सिंचन शाखा कार्यालये जोडून, **लघु पाटबंधारे ग्रामीण कामे उप विभाग, नारायणगाव या बांधकाम कार्यप्रकारातील उप विभागासह,** रुपांतरीत विभाग, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे अंतर्गत उपसा सिंचन व्यवस्थापन विभाग, पुणे या नावाने सिंचन व्यवस्थापन कामासाठी कार्यान्वित करण्यात येत आहे.

२) पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे या मंडळांतर्गतच्या खडकवासला पाटबंधारे विभाग, पुणे अधिनस्त असलेला **खडकवासला कालवा उपविभाग क्र.३, इंदापूर हा बांधकाम कार्यप्रकारातील उप विभाग सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत करण्यात येत आहे.** या रुपांतरीत उप विभागास **याच मंडळ व विभागाधिनस्त असलेल्या** खडकवासला पाट. उ.वि. क्र.१, दौंड (सिंचन) या उप विभागांतर्गत कार्यरत असलेली अस्तित्वातील ४ सिंचन शाखा कार्यालये रुपांतरीत उप विभागास जोडून, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे अंतर्गत खडकवासला प्रकल्प सिंचन व्यवस्थापन उप विभाग, इंदापूर या नावाने सिंचन व्यवस्थापन कामासाठी कार्यान्वित करण्यात येत आहे.

३) पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे या मंडळांतर्गतच्या भामा आसखेड धरण विभाग, पुणे अंतर्गतचा **भामा आसखेड उपविभाग क्र.५, करंजविहिरे हा बांधकाम कार्यप्रकारातील उप विभाग सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत करण्यात येत आहे. या रुपांतरीत उप विभागास** पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे या मंडळ कार्यालयाकडील ३ अस्तित्वातील व २ नवीन अशी एकूण ५ सिंचन शाखा कार्यालये जोडून, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे अंतर्गत भामा आसखेड सिंचन व्यवस्थापन उप विभाग, करंजविहिरे या नावाने सिंचन व्यवस्थापन कामासाठी कार्यान्वित करण्यात येत आहे.

उपरोक्त रुपांतरणामुळे निर्माण होणाऱ्या विभाग, उप विभाग व शाखा इ. कार्यालयांची रचना व अस्तित्वातील पदांचा तपशिल सोबतच्या प्रपत्र - “अ” “ब” “क” व “ड” प्रमाणे राहील.

३. उपरोक्त रुपांतरीत होणाऱ्या विभाग/ उप विभाग कार्यालयांना खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) या बांधकाम कार्यप्रकारातील विभाग व उप विभाग कार्यालयांची संपूर्ण आस्थापना मंजूर पदांसह रुपांतरीत सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारातील विभाग व उप विभाग कार्यालयास वर्ग करण्यात यावी.

आ) रुपांतरीत करण्यात आलेल्या कार्यालयांना आवश्यक असलेली पदे **प्रपत्र “ड”** मधील पदांमधूनच वापरण्यात यावी. सद्य:स्थितीत कोणतीही नवीन पदे निर्माण करण्यात येणार नाहीत.

इ) उपलब्ध रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदांकडून समकक्ष वेतनश्रेणीतील पदांची कामे अतिरिक्त कार्यभार देवून करुन घेता येतील.

ई) वर्गीकरण / सिंचन व्यवस्थापनासाठी रुपांतरीत झालेली सर्व कार्यालये शासकीय जागेतच ठेवावीत. त्यासाठी बांधकामाचा वेगळयाने खर्च करु नये. तसेच सध्याच्या कार्यरत विभाग, उपविभाग व शाखा कार्यालयातील

उपलब्ध साहित्याचाच वापर करण्यात यावा. प्रशासकीय, आस्थापना खर्चात वाढ होणार नाही याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक ईआरडब्ल्यु-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दिनांक ८ मार्च,१९८४ मधील तरतूदीनुसार, संबंधित विभागांचे " कार्यकारी अभियंता " यांना आहरण व संवितरण अधिकारी व " अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे " हे या कार्यालयांचे नियंत्रण अधिकारी म्हणून यान्वये घोषित करण्यात येत आहे.

५. या रुपांतरीत कार्यालयांसाठी होणारा खर्च मुख्य लेखाशीर्ष - "२७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे, ००१ संचालन व प्रशासन, (०४) व्यवस्थापन आस्थापना, (०४)(०७) अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे (२७०१ ९९३१)" या लेखाशीर्षा खालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. उपरोक्त नमूद केलेली कार्यालये मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे प्रादेशिक विभागांतर्गत पुणे विभागामध्ये दिनांक १/९/२०१४ पासून कार्यान्वित होतील या दृष्टीने कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांनी आवश्यक ती सर्व कार्यवाही करावी. कार्यालयाच्या नावातील बदल दि.१/४/२०१५ पासून अंमलात आणावेत. तसेच दि.३१/३/२०१५ पर्यंत वेतनाबाबत सध्याचीच कार्यपध्दती चालू ठेवण्यात यावी.

रुपांतरीत केलेल्या विभाग / उपविभागातील अस्तित्वातील कार्यभार इतर कार्यालयाकडे सोपविण्याबाबतचे तसेच रुपांतरीत न केलेले उपविभाग इतरत्र जोडणेबाबतचे आदेश मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे यांनी स्वतंत्रपणे निर्गमित करावेत.

७. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५-१०-१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने हा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०५१८११३६०७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subodh Sadashiv Dangle

Digitally signed by Subodh Sadashiv Dangle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subodh Sadashiv Dangle
Date: 2014.09.05 18:13:26 +05'30'

**( सु. स. डांगळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव

४) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
५) मा.मंत्री (कष्णा खोरे) यांचे खाजगी सचिव
६) मा.मंत्री (खारजमीन) यांचे खाजगी सचिव
७) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक
८) मा.राज्यमंत्री (लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक
९) मा.विधानसभा/विधान परिषद सदस्य (सर्व)
१०) प्रधान सचिव (ज.सं.प्र.व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११) प्रधान सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
१३) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर
१४) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१५) सर्व कार्यकारी संचालक, महामंडळे / सर्व महासंचालक
१६) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
१७) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) मुख्य अभियंता, (जसं), जलसंपदा विभाग, पुणे
१९) सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
२०) अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे
२१) अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे
२२) कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग क्र.१, पुणे
२३) कार्यकारी अभियंता, खडकवासला पाटबंधारे विभाग, पुणे
२४) कार्यकारी अभियंता, भामा आसखेड धरण विभाग, पुणे
२५) सर्व अधिकारी व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२६) संगणक कार्यक्रम कक्ष, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२७) (कार्यालयांच्या कार्यप्रकार बदलासंदर्भात आवश्यक ती नोंद घेण्यास्तव)
२८) आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ .

( शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१४/प्र. क्र.२१२/ २०१४/आ.(प्रशि), दिनांक :- ५ सप्टेंबर, २०१४. **प्रपत्र- अ**)

**पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे अंतर्गत उपसा सिंचन व्यवस्थापन विभाग, पुणे या रुपांतरीत कार्यालयाची रचना.**

| सध्याचे मंडळ,विभाग, उपविभाग (सिंचन कार्यप्रकार) | सिंचन व्यवस्थान कार्यप्रकारात वर्ग करावयाचे कार्यालय (विभाग /उपविभाग) | शाखा कार्यालय (सिंचन व्यव.शाखा ) | निर्माण सिंचन क्षमता रब्बी समतुल्य ( हेक्टरमध्ये ) (फेब्रुवारी,२०१४ अखेर) |
|---|---|---|---|
| **पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे** | **पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे** | ---- | **एकूण हेक्टर** |
| **अ) लघु पाटबंधारे विभाग क्र.१, पुणे (बांधकाम)** (अस्तित्वातील विभाग) | **अ) उपसा सिंचन व्यवस्थापन विभाग, पुणे** (मुळ कार्यप्रकारात बदल करुन नव्याने निर्माण केलेला उपविभाग | ---- | **७४,२७९ हेक्टर** |
| **१) लघु पाटबंधारे उप विभाग, सासवड** (बांधकाम) | **१) पुरंदर उपसा सिंचन व्यवस्थापन उप विभाग, सासवड** (सिंचन) | अंतर्गत ४ नवीन शाखा<br>१) परंदर उपसा सिंचन, सासवड<br>२) पुरंदर उपसा सिंचन, पारगांव<br>३)पुरंदर उपसासिंचन शिर्षकामे शाखा<br>४)शिंदवणे पुरंदर उपासा सिंचन शाखा, मोरगांव | **१३,७६९ हेक्टर** |
| **२) लघु पाटबंधारे उप विभाग, शिरुर** (बांधकाम) | **२) पुरंदर उपसा सिंचन व्यवस्थापन उप विभाग, शिंदवणे** (सिंचन) | अंतर्गत ४ नवीन शाखा<br>१) पुरंदर उपसा सिंचन शाखा क्र.१, शिंदवणे<br>२) पुरंदर उपसा सिंचन शाखा क्र.२, शिंदवणे<br>३) पुरंदर उपसा सिंचन शाखा, माळशिरस<br>४) पुरंदर उपसा सिंचन शाखा, पिसर्वे | **१६,२८४ हेक्टर** |
| **३) लघु पाटबंधारे उप विभाग, दौंड** (बांधकाम) | **३) जनाई शिरसाई उपसा जलसिंचन व्यव. उपविभाग, दौंड** (सिंचन) | अंतर्गत ४ नवीन शाखा<br>१) जनाई शिरसाई उपसा सिंचन शाखा, कुसेगाव<br>२) जनाई शिरसाई उपसा सिंचन शाखा, सुपा<br>३) जनाई शिरसाई उपसासिंचन शाखा, रिसे-पिसे<br>४) जनाईशिरसाई उपसासिंचन शाखा,उंडवडी सुपा | **२८,४१९ हेक्टर** |
| **४) लघु पाटबंधारे सर्वेक्षण उपविभाग,(स्थानि.स्तर.), पुणे** (बांधकाम) | **४) पुरंदर उपसा सिंचन व्यववस्थापन उप विभाग, नाझरे** (सिंचन) | अंतर्गत ४ शाखा<br>(२ अस्तित्वातील व २ नवीन )<br>१) नाझरे धरण शाखा, नाझरे (अस्ति.)<br>२) गराडे पाटबंधारे शाखा, गराडे (अस्ति.)<br>३) पुरंदर उपसा सिंचन, नाझरे (नवीन)<br>४) कन्हा नदी को.प. बंधारे (नवीन) | **१५,८०७ हेक्टर** |
| ५) लघु पाट. ग्रामीण कामे उ.वि. नारायण गाव (बांध) अस्तित्वातील | ५) लघु पाट. ग्रामीण कामे उ.वि., नारायणगाव (बांधकाम) अस्तित्वातील | -------- | ------ |

Subodh Sadashiv Dangle

Digitally signed by Subodh Sadashiv Dangle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subodh Sadashiv Dangle
Date: 2014.09.05 18:13:57 +05'30'

**(सु. स. डांगळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

(शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१४/प्र. क्र.२१२/ २०१४/आ.(प्रशि), दिनांक :- ५ सप्टेंबर, २०१४. **प्रपत्र-ब)**

**पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे अंतर्गत खडकवासला पाटबंधारे विभाग, पुणे या विभागाची रचना**

| **सध्याचे मंडळ,विभाग, उपविभाग (सिंचन कार्यप्रकार)** | **सिंचन व्यवस्थान कार्यप्रकारात वर्ग करावयाचे कार्यालय (विभाग /उपविभाग)** | **शाखा कार्यालय (सिंचन व्यव.शाखा )** | निर्माण सिंचन क्षमता रब्बी समतुल्य ( हेक्टरमध्ये ) (फेब्रुवारी,२०१४ अखेर) |
|---|---|---|---|
| **पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे** | **पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे** | ---- | |
| खडकवासला पाटबंधारे विभाग, पुणे (सिंचन+बांधकाम) | खडकवासला पाटबंधारे विभाग, पुणे (सिंचन+बांध.) | | **१,७९,५९५ हेक्टर** |
| **१) खडकवासला कालवा उपविभाग क्र.३, इंदापूर** (बांधकाम) | **१) खडकवासला प्रकल्प सिंचन व्यवस्थापन उप विभाग, इंदापूर** (सिंचन व्यवस्थापनासाठी रुपांतरीत ) | अंतर्गत अस्तित्वातील ४ शाखा<br>1) शैटफळगडे पाटबंधारे शाखा (अस्ति.)<br>2) पळसदेव पाटबंधारे शाखा (अस्ति.)<br>3) लोणी देवकर पाटबंधारे शाखा (अस्ति.)<br>4) इंदापूर पाटबंधारे शाखा (अस्ति.) | **२६,६६९ हेक्टर** |
| मुठा उजवा कालवा उ.वि., पुणे (सिंचन) अस्तित्वातील | मुठा उजवा कालवा उ.वि., पुणे (सिंचन) अस्तित्वातील | अंतर्गत ९ शाखा (पदांशिवाय मंजूर ३) | |
| यवत पाट.उ.वि.,यवत (सिंचन) अस्तित्वातील | यवत पाट.उ.वि.,यवत (सिंचन) अस्तित्वातील | अंतर्गत ४ शाखा (पदांशिवाय मंजूर १) | |
| उपसा जल सिंचन उ.वि.,पवनानगर (सिंचन) अस्तित्वातील | उपसा जल सिंचन उ.वि.,पवनानगर (सिंचन) अस्तित्वातील | अंतर्गत ५ शाखा | |
| खडकवासला पाट.उ.वि., पाटस (सिंचन) अस्तित्वातील | खडकवासला पाट.उ.वि., पाटस (सिंचन) अस्तित्वातील | अंतर्गत ५ शाखा (पदांशिवाय मंजूर ४) | |
| खडकवासला पाट.उ.वि.क्र.१, दौंड (सिंचन) अस्तित्वातील | खडकवासला पाट.उ.वि.क्र.१, दौंड (सिंचन) अस्तित्वातील | अंतर्गत ३ शाखा (सर्व पदांशिवाय मंजूर) | |
| चासकमान प्रकल्प उ.वि.क्र.५, राजगुरुनगर (सिंचन) अस्तित्वातील | चासकमान प्रकल्प उ.वि.क्र.५, राजगुरुनगर (सिंचन) अस्तित्वातील | अंतर्गत ५ शाखा (सर्व पदांशिवाय मंजूर ) | |
| खडकवासला कालवा उ.वि.क्र.१, स्वारगेट (बांध.) अस्तित्वातील | खडकवासला कालवा उ.वि.क्र.१, स्वारगेट (बांध.) अस्तित्वातील | ---- | |
| चासकमान प्रकल्प उ.वि.क्र.४, शिरुर (बांध.) अस्तित्वातील | चासकमान प्रकल्प उ.वि.क्र.४, शिरुर (बांध.) अस्तित्वातील | ---- | |
| तपासणी पथक उ.वि., पुणे (यांत्रिकी) अस्तित्वातील | तपासणी पथक उ.वि., पुणे (यांत्रिकी) अस्तित्वातील | ---- | |

Subodh Sadashiv Dangle

Digitally signed by Subodh Sadashiv Dangle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subodh Sadashiv Dangle
Date: 2014.09.05 18:14:23 +05'30'

**(सु. स. डांगळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

( शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१४/प्र. क्र.२१२/ २०१४/आ.(प्रशि), दिनांक :- ५ सप्टेंबर, २०१४. **प्रपत्र- क**)

**पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे अंतर्गतचा बांधकाम कार्यप्रकारातून सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे कार्यालयास वर्ग होणाऱ्या कार्यालयांचा तपशील व पुणे पाटबंधारे विभाग, पुणे (सिंचन) कार्यालयाची रचना.**

| **सध्याचे मंडळ,विभाग, उपविभाग (सिंचन कार्यप्रकार)** | **सिंचन व्यवस्थान कार्यप्रकारात वर्ग करावयाचे कार्यालय (विभाग /उपविभाग)** | **शाखा कार्यालय (सिंचन व्यव.शाखा )** | **निर्माण सिंचन क्षमता रब्बी समतुल्य ( हेक्टरमध्ये ) (फेब्रुवारी,२०१४ अखेर)** |
|---|---|---|---|
| **पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे** (बांधकाम) | **पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे** (सिंचन) | | |
| भामा आसखेड धरण विभाग, पुणे (बांधकाम) | पुणे पाटबंधारे विभाग, पुणे (सिंचन) | | **१६,४२०५** |
| **१) भामा आसखेड उपविभाग क्र.५, करंजविहिरे** (बांधकाम) | **१) भामा आसखेड सिंचन व्यवस्थापन उप विभाग, करंजविहिरे** (सिंचन व्यवस्थापनासाठी रुपांतरीत) | अंतर्गत ४ शाखा (३-अस्तित्वातील व १-नवीन ) १) वडगांव मावळ पाटबंधारे शाखा (अस्ति.) २) खेड पाटबंधारे शाखा क्र.१, खेड (अस्ति.) ३) कोंढापूरी पाटबंधारे शाखा (अस्ति.) ४) कोंढापूरी पाटबंधारे शाखा क्र.१, कोंढापूरी (नवीन) ५) खेड पाटबंधारे शाखा, खेड (नवीन) | **३२,४४३ हेक्टर** |
| **पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे** (सिंचन) अंतर्गत | | | |
| पुणे पाटबंधारे विभाग, पुणे (सिंचन) अंतर्गत | | | |
| २) नीरा पाट.उ.वि.नीरा (सिंचन) अस्तित्वातील | २) नीरा पाट.उ.वि.नीरा (सिंचन) अस्तित्वातील | अंतर्गत ४ शाखा (पदांशिवाय मंजूर १) अस्तित्वातील | |
| ३) पणदरे पाट.उ.वि., माळेगाव (सिंचन) अस्तित्वातील | ३) पणदरे पाट.उ.वि., माळेगाव (सिंचन) अस्तित्वातील | अंतर्गत ४ शाखा अस्तित्वातील | |
| ४) बारामती पाट. उ.वि., बारामती (सिंचन) अस्तित्वातील | ४) बारामती पाट. उ.वि., बारामती (सिंचन) अस्तित्वातील | अंतर्गत ६ शाखा अस्तित्वातील | |
| ५) खडकवासला कालवा उ.वि.क्र.२, पुणे (सिंचन) अस्तित्वातील | ५) खडकवासला कालवा उ.वि.क्र.२, पुणे (सिंचन) अस्तित्वातील | अंतर्गत ३ शाखा (२ पदांशिवाय मंजूर) अस्तित्वातील | |

Subodh Sadashiv Dangle

Digitally signed by Subodh Sadashiv Dangle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subodh Sadashiv Dangle
Date: 2014.09.05 18:14:45 +05'30'

**(सु. स. डांगळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

(शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१४/प्र. क्र.२१२/२०१४/आ.(प्रशि), दिनांक :- ५ सप्टेंबर, २०१४. सोबतचे **प्रपत्र-ड**)

पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे व पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे या मंडळ कार्यालयांतर्गत अस्तित्वातील बांधकाम कार्यप्रकारातून सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात वर्ग करावयाची (१ विभाग, ६ उप विभाग व ९ शाखा) मंजूर पदांचा तपशील

| **अ. क्र.** | **वर्गवार पदाचे नांव** | **विभागीय पदे (१-विभाग)** | **उप विभागीय पदे (१-उपविभाग)** | **सिंचन शाखा पदे (९-शाखा)** | **एकूण** |
|---|---|---|---|---|---|
| १ | कार्यकारी अभियंता | १ | ० | ० | **१** |
| २ | उपकार्यकारी / उपविभागीय अभि./ अधिकारी | १ | ६ | ० | ७ |
| ३ | सहा.अभि.-२ / शाखा अभि. / कनिष्ठ अभियंता | ४ | २४ | ३ | ३१ |
| ४ | विभागीय लेखापाल | १ | ० | ० | १ |
| ५ | प्रथम लिपीक | १ | ० | ० | १ |
| ६ | भांडारपाल | १ | ० | ० | १ |
| ७ | सहायक भांडारपाल | १ | ० | ० | १ |
| ८ | सहा. आरेखक/ आरेखक | १ | ० | ० | १ |
| ९ | लघु टं.ले. /नि.श्रे.लघुलेखक | १ | ० | ० | १ |
| १० | वरिष्ठ लिपीक | ५ | ६ | ० | ११ |
| ११ | अनुरेखक | १ | ६ | ० | ७ |
| १२ | कनिष्ठ लिपीक | ४ | १२ | ० | १६ |
| १३ | दप्तर कारकून | ० | ० | ६ | ६ |
| १४ | टंकलेखक | ३ | ६ | ० | ९ |
| १५ | संगणक | १ | ० | ० | १ |
| १६ | वाहन चालक | १ | ६ | ० | ७ |
| १७ | स्थापत्य अभियांत्रि.सहायक | ० | २४ | ३ | २७ |
| १८ | मोजणीदार | ० | ० | १२ | १२ |
| १९ | कालवा निरिक्षक | ० | ० | २४ | २४ |
| २० | संदेशक | ० | ० | ३ | ३ |
| २१ | कालवे चौकीदार | ० | ० | ९ | ९ |
| २२ | कालवे टपाली | ० | ० | ३ | ३ |
| २३ | नाईक | १ | ० | ० | १ |
| २४ | शिपाई | ५ | १२ | ३ | २० |
| २५ | चौकीदार | १ | ६ | ० | ७ |
| | **एकूण** | **३४** | **१०८** | **६६** | **२०८** |

(टिप : उपरोक्त प्रपत्र ब मध्ये दर्शविलेल्या ९ शाखा कार्यालयांपैकी ६ शाखा कार्यालयाना पदांशिवाय शासन मंजूरी देण्यात आलेली आहे.)

Subodh Sadashiv Dangle

Digitally signed by Subodh Sadashiv Dangle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subodh Sadashiv Dangle
Date: 2014.09.05 18:15:17 +05'30'

**(सु. स. डांगळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**